क्रमांक : स्वग्रायो-२०११/ प्र.क्र.३/योजना- ३,
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
मंत्रालय, मुंबई - ४०००३२
दिनांक : ८ फेब्रुवारी, २०११.

प्रति,

मुख्य कार्यकारी अधिकारी,
जिल्हापरिषद तथा अध्यक्ष कार्यकारी समिती,
जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा,
सोलापूर.

विषय :-स्वर्ण जयंती ग्राम स्वरोजगार योजने अंतर्गत स्थापित स्वयंसहायता गटांच्या ग्राम सेवा संघातील सभासदांना प्रशिक्षण देणेबाबत.

संदर्भ:- आपले क्रमांक:जिग्रावियंसो/स्वग्रास्वयोम/संघ/६९०/२६४०/ १०, दि. ६ डिसेंबर, २०१० चे पत्र.

महोदय,

संदर्भाधीन पत्रान्वये प्रस्तावित केल्यानुसार, सोलपूर जिल्हयातील एकूण ११ पंचायत समितीमधील २१५ ग्राम सेवा संघातील एकूण ४ सदस्य, याप्रमाणे एकूण ८६० प्रशिक्षणार्थींना मिटकॉन या संस्थेमार्फत २ दिवसांचे निवासी प्रशिक्षण देण्यास व त्यासाठी प्रति दिन प्रति प्रशिक्षणार्थी रु.२००/- याप्रमाणे एकूण रु.३.४४ लाख इतका खर्च स्वर्ण जयंती ग्राम स्वरोजगार योजनेतील प्रशिक्षण या शिर्षाखालील उपलब्ध निधीतून भागविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

आपला विश्वासू,

( रा.शं.नागरे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत आवश्यक त्या कार्यवाहीसाठी :-

मुख्य कार्यकारी अधिकारी तथा अध्यक्ष, कार्यकारी समिती, जिल्हा परिषद, ग्रामविकास यंत्रणा(सर्व)(सोलापूर वगळून).

सोबत ग्रामसेवा संघ संकल्पना प्रशिक्षण कार्यक्रमाबाबत मिटकॉन, सोलापूर यांनी तयार केलेल्या कार्यक्रम पत्रिकेची प्रत पाठविली आहे.

२. शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांक:स्वग्रावि-२००८/ प्र.क्र.१००३ /योजना- ३, दिनांक ६ जुलै, २००९ अन्वये गटांना प्रोत्साहन म्हणून मदत व्हावी व आपसातील समन्वय सुलभ व्हावा यासाठी स्वयंसहायता गटांची गाव, मंडळ, तालुका व जिल्हास्तरावर सेवासंघ स्थापन करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. यातील प्रत्येक गटांचे नोंदणीकरण The Indian Public Trusts Act, १८८२ अथवा सोसायटीज् रजिस्ट्रेशन ॲक्ट, १८६० अंतर्गत करावयाचे आहे.

३.	या निर्णयाचा पहिला टप्पा म्हणून गाव पातळीवरील ग्रामपंचायत क्षेत्रामध्ये असलेल्या सर्व गटांचे संघ स्थापन करण्याच्या सूचना अ.शा.पत्र क्रमांकःस्वग्रायो-२००९/ प्र.क्र.२६७/योजना- ३, दिनांक १३ नोव्हेंबर, २००९ अन्वये सचिव, ग्राम विकास यांच्या स्तरावरुन देण्यात आल्या. त्याचप्रमाणे डिसेंबर, २००९ ते फेब्रुवारी, २०१० या कालावधीत कृति कार्यक्रम घेण्यात आला, त्यामध्ये संघ स्थापना या कार्यक्रमाचा अंतर्भाव होता.

४.	या सेवासंघाच्या कार्यपध्दती, त्यांच्या सभा, नोंदणीकरण इ.बाबत सभासदांना प्रशिक्षण देणे गरजेचे आहे. यासाठी मिटकॉन या संस्थेने सोलापूर जिल्ह्यासाठी प्रस्ताव सादर केला असून त्यात खालील बाबींचा अंतर्भाव आहे :-

अ) प्रशिक्षणाचे विषय :-

(१) फेडरेशन संकल्पना

(२) फेडरेशन कार्यपध्दती व नोंदणी

(३) फेडरेशनद्वारे विविध सेवा पुरविणे

(४) शासकीय योजनांचा लाभ

(५) अर्थसहाय्य

(६) फेडरेशनद्वारे गटांच्या अडचणी सोडविणे इ.

ब) प्रशिक्षण कालावधी :-

सदर प्रशिक्षण तालुका स्तरावर निवासी स्वरुपाचे २ दिवसांचे आहे.

क) खर्च :-

प्रति दिन प्रति प्रशिक्षणार्थी रु.२००/- या प्रमाणे असून त्यामध्ये भोजन, निवास व्यवस्था, वाचन साहित्य, प्रशिक्षकाचे मानधन, हॉलभाडे इ.चा समावेश आहे.

५.	शासन परिपत्रक, दिनांक १४ सप्टेंबर, १९९९ अन्वये जिल्ह्याच्या गरजेप्रमाणे मिटकॉन या संस्थेला स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजनेअंतर्गत सहभागी करुन घेण्याबाबत सूचना देण्यात आल्या आहेत. दिनांक २२ मे, २००९ च्या शासन निर्णयान्वये या सूचनांचा पुनरुच्चार करण्यात येऊन स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजनेअंतर्गत प्रशिक्षण देण्यासाठी आवश्यकतेनुसार या संस्थेचा विचार करण्याचे आदेश जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांना देण्यात आले आहेत.

६.	गटाचे संघीकरण हा योजनेचा महत्वाचा भाग असून राष्ट्रीय जिवनोन्नती अभियान कार्यक्रमात गटाच्या सेवासंघाला महत्वाचे स्थान देण्यात आले आहे. हे पहाता जिल्ह्यातील स्थापित सेवा संघ गटातील अध्यक्ष, सचिव व दोन सक्रिय सभासद असे ४ प्रशिक्षणार्थींना वर स्पष्ट केलेल्या शुल्काच्या मर्यादेत प्रशिक्षण देण्यात यावे.

प्रत,

व्यवस्थापकीय संचालक, मिटकॉन कन्सल्टन्सी सर्व्हिसेस लि., कुबेरा चेंबर्स, शिवाजीनगर, पुणे ४११ ००५.

09/02/2011

( रा.शं.नागरे )

अवर सचिव, महाराष्ट्र शासन